**दर्जेदार मराठी चित्रपटांना निर्मितीसाठी प्रोत्साहन देण्याकरीता अर्थसहाय्य मंजूर करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: मचिअ-२०२४/प्र.क्र.१०८/सां.का.१.**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ११ फेब्रुवारी, २०२५.

**वाचा :** १) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. मचिअ-२०१२/प्र.क्र.१४१/ सां.का.१, दि.३० ऑक्टोबर, २०१३

२) शासन शुध्दीपत्रक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्रमांक मचिअ-२०१२/ प्र.क्र.१४१/सां.का.१, दि.२८ ऑगस्ट, २०१४

३) शासन शुध्दीपत्रक,पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्रमांक मचिअ-२०१२/ प्र.क्र.१४१/सां.का.१, दि.०८ ऑगस्ट, २०१८

४) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. गोचिन-२०२२/प्र.क्र.५८/ सां.का.१, दि.२५ जानेवारी, २०२३

५) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. गोचिन-२०२२/प्र.क्र.५८/ सां.का.१, दि.०३ मार्च, २०२३

६) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. मचिअ-२०२४/प्र.क्र.८९/ सां.का.१, दि.२५ सप्टेंबर, २०२४

७) शासन शुध्दीपत्रक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. मचिअ-२०२४/प्र.क्र.८९/ सां.का.१, दि.०७ ऑक्टोबर, २०२४

८) मुख्य प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांचे दि.१९ सप्टेंबर, २०२४ रोजीचे पत्र.

९) मुख्य प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांचे दि.२७ सप्टेंबर, २०२४रोजीचे पत्र.

१०) सह-व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांचे दि.१० ऑक्टोबर, २०२४ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना:**

दर्जेदार मराठी चित्रपट निर्मितीसाठी प्रोत्साहन देण्याकरीता अर्थसहाय्य करण्यासाठी उपर्निर्दिष्ट १ अन्वये धोरण निश्चित करण्यात आलेले आहे. सदर चित्रपटांची पात्रता तपासण्यासाठी संदर्भ क्र. ४ व ५ येथील शासन निर्णयान्वये समिती गठीत करण्यात आलेली आहे. सदर गठीत समितीमार्फत छाननीअंती शिफारशीत केलेल्या एकूण ०६ चित्रपटांना संदर्भ क्र. ८ व १० येथील पत्रान्वये तसेच संदर्भ क्र. ९ च्या पत्रान्वये ०५ महिला दिग्दर्शकांना अनुदान देण्याचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आलेला आहे. त्यान्वये, प्राप्त ०६ चित्रपटांना व ०५ महिला दिग्दर्शकांना अनुदान प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

दर्जेदार मराठी चित्रपट निर्मितीसाठी प्रोत्साहन योजनेंतर्गत उपनिर्दिष्ट १ ते ३ व ६ मधील शासन निर्णयात नमूद तरतूदीनुसार खालील तक्ता “अ” मध्ये नमूद ०६ चित्रपटांना रुपये २.६४ कोटी (अक्षरी रुपये दोन कोटी चौसष्ट लक्ष फक्त) इतक्या निधीस व खालील तक्ता “ब” मध्ये नमूद ०५ महिला दिग्दर्शकांना प्रत्येकी रुपये ०५.०० लक्ष याप्रमाणे रुपये २५.०० लक्ष (अक्षरी रुपये पंचवीस लक्ष) असे एकूण रुपये २.८९ कोटी (अक्षरी रुपये दोन कोटी एकोणनव्वद लक्ष) इतक्या रकमेस या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

**तक्ता "अ"** **(रुपये लक्ष)**

| अ क्र | चित्रपट निर्मिती संस्थेचे नाव | चित्रपटाचे नांव | दर्जा | प्रत्यक्षात देय रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | मे. मयसभा करमणूक मंडळी, एल.एल.पी | वाळवी | अ | ७९.०० |
| २ | मे. नाईटीनाईन प्रोडक्शन्स | बापल्योक | अ | ३९.०० |
| ३ | मे. टाईम लॅप्स प्रोडक्शन | गाभ | अ | ३९.०० |
| ४ | मे. धनंजय भावलेकर मोशन पिक्चर्स | कर्मवीरायण | अ | ३९.०० |
| ५ | मे. अक्षय प्रोडक्शन | चंद्रभागा | ब | २९.०० |
| ६ | मे. गोविंद प्रोडक्शन्स | आसुड | अ | ३९.०० |
| | | | एकूण | २६४.०० |

**तक्ता "ब"** **(रुपये लक्ष)**

| अ.क्र. | महिला दिग्दर्शकाचे नाव | चित्रपटाचे नांव | परिक्षणाचे वर्ष | दर्जा | रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १. | श्रीमती शफक खान | येरे येरे पावसा | ०५.०२.२०२४ | अ | ५.०० |
| २. | श्रीमती रसिका आगाशे | तिचं शहर होणं | ०६.०२.२०२४ | अ | ५.०० |
| ३. | श्रीमती मीरा वेलणकर | बटरफ्लाय | १५.०५.२०२४ | अ | ५.०० |
| ४. | श्रीमती कविता दातीर | गिरकी | २७.०५.२०२४ | अ | ५.०० |
| ५. | श्रीमती प्रियांका तन्वर | मायलेक | २८.०५.२०२४ | ब | ५.०० |
| | | | | एकूण | २५.०० |

**०२.** यासाठी होणारा खर्च "मागणी क्र.झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती कार्यक्रम (००) १०२, कला संस्कृती प्रचालन (०३) (०७) मराठी चित्रपट निर्मितीसाठी सहायक अनुदान **(२२०५ १५९९) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)** "या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात उपलब्ध निधीमधून भागविण्यात यावा.

**०३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०२१११७४६१५६७२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIROODHA SURYAKANT DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=d34fa92fd12dd57b9647dbd172129b5c0eb8b1cd7ff442b98831311214458302, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE1899269D4FAAF88991AC3364BDCC437CF37, cn=ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
Date: 2025.02.11 17:47:52 +05'30'

**(अनिरुध्द सु. देशपांडे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य), मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, सांस्कृतिक कार्य, मंत्रालय, मुंबई.
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई.
४. नियोजन विभाग (का.१४४३), मंत्रालय, मुंबई
५. वित्त विभाग (व्यय-१५, अर्थसंकल्प) मंत्रालय, मुंबई.
६. निवडनस्ती(सां.का.१).